**निवडणूक विषयक साहित्य वितरणासाठी**
**“समन्वय अधिकारी” प्राधिकृत करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## मुख्य निवडणूक अधिकारी महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय

शासन आदेश क्र.संकीर्ण२०२४/प्र.क्र.११/२४/निवडणूक १२
सामान्य प्रशासन विभाग, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ९ ऑगस्ट, २०२४.

**पार्श्वभूमी :**

आगामी विधानसभा निवडणूक-२०२४ नजीकच्या काळात प्रस्तावित असून, सदर निवडणूकीची पूर्व तयारी म्हणून निवडणूक साहित्याची छपाई / उत्पादन / पुरवठा करण्याची कार्यवाही सुरु आहे. विधानसभा सार्वत्रिक निवडणूक -२०२४ च्या अनुषंगाने संबंधित विधानसभा मतदार संघाच्या निवडणूक निर्णय अधिकारी यांचेकडे निवडणूक साहित्याचा पुरवठा विविध माध्यमांमार्फत करण्यात येणार आहे. सदर निवडणूक साहित्य सबंधित निवडणूक निर्णय अधिकारी यांचेकडे कालमर्यादेत व सुरळीतपणे पुरवठा /पोहोच होणेकरिता मुद्रणालय, निवडणूक निर्णय अधिकारी व विविध माध्यम यांचेमध्ये समन्वय साधणेकरिता मुद्रणालय ज्या जिल्ह्याच्या ठिकाणी आहे त्या उपजिल्हाधिकारी तथा उप निवडणूक निर्णय अधिकारी यांना सदरचे कामासाठी “समन्वय अधिकारी” म्हणून प्राधिकृत बाब विचाराधीन आहे.

**आदेश :**

विधानसभा सार्वत्रिक निवडणूकीकरिता साहित्यांची छपाई / उत्पादन मुद्रणालय येथे होणार आहे. निवडणूक कामकाज हे संवेदनशील असून, ते कालमर्यादेत होणे अपेक्षित आहे. याकरिता मुद्रणालयात होणाऱ्या निवडणूक साहित्याची छपाई तसेच उत्पादनावर निरिक्षण (Observation) करणेसाठी तसेच सदर साहित्य सबंधित निवडणूक निर्णय अधिकारी यांचेकडे सुरळीतपणे व कालमर्यादेत पुरवठा /पोहोच होणेकरिता मुद्रणालय, निवडणूक निर्णय अधिकारी व विविध माध्यम यांचेमध्ये समन्वय साधणेकरिता मुद्रणालय ज्या जिल्ह्याच्या ठिकाणी आहे त्या उप जिल्हाधिकारी तथा उप जिल्हा निवडणूक निर्णय अधिकारी यांना सदरचे कामासाठी “समन्वय अधिकारी” म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी यांनी त्यांचेसमोर दर्शविलेल्या मुद्रणालयाशी, संबधित जिल्ह्यांच्या निवडणूक निर्णय अधिकारी तसेच विविध माध्यमांशी समन्वय साधावा:

| अ.क्र. | जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी | मुद्रणालय |
|---|---|---|
| १. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, मुंबई | शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई |
| २. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, पुणे | फोटोझिको मुद्रणालय, पुणे |
| | | येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे |
| ३. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, सातारा | शासकीय मुद्रणालय, वाई |
| ४. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, संभाजीनगर | शासकीय मुद्रणालय, छत्रपती संभाजीनगर |

| | | |
|---|---|---|
| ५. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, नागपूर | शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर<br>मध्यवर्ती कारागृह, नागपूर |
| ६. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, कोल्हापूर | शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार,कोल्हापूर |
| ७. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, नाशिक | भारत प्रतिभूती मुद्रणालय, नाशिक |
| ८. | उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, सांगली | सांगली जिल्हा परिषद मुद्रणालय, सांगली |

मतदान साहित्य वितरणाच्या अनुषंगाने उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी यांची “समन्वय अधिकारी” म्हणून जबाबदारी खालीलप्रमाणे असेल:

**समन्वय अधिकाऱ्याची कर्तव्य/जबाबदारी :**

- विधानसभा मतदार संघासाठी प्रमाणित केलेल्या संख्येनुसार मतदान साहित्य (उदा.विविध प्रकारचे नमुने, पुस्तके, लिफाफे, अन्य समग्री) ची छपाई /उत्पादन संबंधित मुद्रणालयामार्फत होत असल्याबाबत खात्री करणे.
- सदर मतदान साहित्याचे उत्पादन/छपाई याबाबत भारत निवडणूक आयोगाने दिलेल्या निकषानुसार/ मानकानुसार, सदर उत्पादन होत आहे किंवा कसे हे पहाणे. तसेच उत्पादीत/ छपाई करण्यात आलेल्या साहित्याची गुणवत्ता तपासणे.
- सदर साहित्याचे उत्पादन विहीत कालमर्यादेत (Timeline नुसार) होत आहे किंवा कसे हे पहाणे. त्याबाबत संबंधितांकडे पाठपुरावा करणे.
- मुद्रणालयामार्फत उत्पादन केलेल्या साहित्याचा पुरवठा संबंधित निवडणूक निर्णय अधिकारी यांचेकडे विविध माध्यमांद्वारे करण्यात येणार असल्याने, त्याबाबत वैयक्तिकरित्या समन्वय साधून, संबंधित निवडणूक निर्णय अधिकारी यांना कालमर्यादेत साहित्याचा पुरवठा होण्यासाठी दक्षता घेणे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संकेतांक २०२४०८०९१७४३२४७४०७ हा आहे. हे आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

VIKRAM VISHNU NIKAM

Digitally signed by VIKRAM VISHNU NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=ece02616c0c69e135b3e070b240d864fca72b54783d5281e3a5d90fd5ea04d1d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9EB70F4C28BFB91710D15B96D47B5726FE76A08D143EB22AC25A88A6935601BD, cn=VIKRAM VISHNU NIKAM
Date: 2024.08.09 17:59:00 +05'30'

**(विक्रम निकम)**
**अवर सचिव, मुख्य निवडणूक अधिकारी यांचे कार्यालय.**

**प्रति,**

१.जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणुक अधिकारी, मुंबई, पुणे, सातारा, छ. संभाजीनगर, नागपूर , कोल्हापूर
२. उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणुक अधिकारी, मुंबई, पुणे, सातारा, छ. संभाजीनगर, नागपूर, कोल्हापूर
३.व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई
४. व्यवस्थापक, फोटोझिंको मुद्रणालय, पुणे
५. व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे

६.व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, वाई
७. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, छत्रपती संभाजीनगर
८. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर
९.व्यवस्थापक, जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, नागपूर
१०.व्यवस्थापक, मध्यवर्ती कारागृह, नागपूर
११. व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार,कोल्हापूर
१२. व्यवस्थापक, भारत प्रतिभूती मुद्रणालय, नाशिक,
१३.नियंत्रक, जिल्हा परिषद मुद्रणालय, सांगली

**प्रत,**

१. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक, निवडणूक शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सह सचिव व अतिरिक्त मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक, निवडणूक शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी यांचे स्वीय सहायक, निवडणूक शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. निवडनस्ती.